# महाराष्ट्र शासन

क्रमांक : देयक-२०२२/प्र.क.३/१३ अे
कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व
मत्स्यव्यवसाय विभाग
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १२ जानेवारी, २०२२

**विषय** : सन २०१९-२०२० मध्ये तालुका बीज गुणन केंद्रावरील २४०१ ०२६१ लेखाशिर्षाखालील (०२) मजुरी या बाबीखालील प्रलंबित मजूरीच्या रु.१,२८,८७६/ देयकास प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत.

**संदर्भ** :१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३२०/२०१३/ विनियम, दिनांक १७/४/२०१२५

२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृषि/लेखा-१/आस्था/ब-५/१९७८ नियम-४०/ पुणे ७४२/२०२१, दिनांक ७.१.२०२२

**ज्ञापन** :

सन २०१९-२०२० मध्ये विभागीय कृषी सहसंचालक, पुणे विभाग, पुणे कार्यालयाच्या अधिनस्त १) तालुका बीज गुणन केंद्र, भोर २) तालुका बीज गुणन केंद्र, भुकूम ३) तालुका बीज गुणन केंद्र, खडकाळा व ४) तालुका बीज गुणन केंद्र, चहोली या प्रक्षेत्रावरील बिजोत्पादन कार्यक्रम व इतर अनुषंगिक कामे कंत्राटदारामार्फत घेतली जातात. सदर कत्रांटदारांच्या प्रलंबित मजुरीच्या कामाचे देयके रु.१,२८,८७६/- ( अक्षरी रुपये एक लाख अठ्ठावीस हजार आठशे शहात्तर फक्त) अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७/४/२०१५ अन्वये वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला, उपविभाग-१ अनुक्रमांक-६, नियम ४० नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

३. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, १०३-बी बीयाणे, १०३ (००) (०१) तालुका बीज गुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१) अंतर्गत ०२- मजूरी या बाबीखाली सन २०२१-२२ करिता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात येईल, याची दक्षता घ्यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय व वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी, तसे, आढळल्यास याबाबतची जबाबदारी सर्व संबंधितावर राहील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०११२१२३२१७८२०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2022.01.12 12:33:05 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषी) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक ( कृषी प्रक्रिया व नियोज), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय कृषी संहसंचालक, पुणे विभाग, पुणे.
४. उप विभागीय कृषी अधिकारी, पुणे .
५. महालेखापाल-१/२( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/ नागपूर
६. महालेखापाल-१/२( लेखा परिक्षा ) मुंबई/ नागपूर
७. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला, मुंबई-३२
१०. निवडनस्ती/१३ अे